शेतकरी मासिकाच्या छपाईसाठी ई-निविदा प्रक्रिया तसेच दर निश्चित करण्यास मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

**शासन निर्णय क्र.शेमाछ-२०१६/प्र.क्र.२९०/११-अे,**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : २३ मार्च, २०१७**

**वाचा -**

१) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र.शेमासे-१२०७/२०४५१/प्र.क्र.२५/११-अे, दि.५.१.२००८
२) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र.शेमाछ-२०१५/प्र.क्र.५५/११-अे, दि.६.११.२०१५
३) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.कृआ/शेमासे/शे.अंक.छ.मं./६६६/१६, दि. २१.१०.२०१६

**प्रस्तावना -**

शेतकऱ्यांच्या हितार्थ सन १९६५ पासून प्रकाशित करण्यात येणाऱ्या शेतकरी मासिकाच्या माध्यमातून कृषि क्षेत्रातील लक्षवेधक तसेच अद्ययावत घडामोडींची माहिती राज्यातील व राज्याबाहेरील शेतकऱ्यांना पोहचविण्यात येते. कृषि विभागाच्या दि.६.११.२०१५ च्या शासन निर्णयानुसार शेतकरी मासिकाच्या एप्रिल, २०१५ ते मार्च, २०१६ या कालावधीच्या अंक छपाईचे काम निविदा प्रक्रिया राबवून न्यूनतम निविदा देणाऱ्या निविदाकाराकडे सोपविण्यात आले होते. सदर कराराची मुदत संपल्यानंतर आयुक्त (कृषि) यांनी त्यांचे स्तरावर निविदा काढून त्या पुढील कालावधीसाठी निविदा प्रक्रिया पूर्ण करुन त्यांच्या दि.२१.१०.२०१६ च्या पत्राने शासनास प्रस्ताव सादर केला. दरम्यानचे काळात एप्रिल, २०१६ पासून पुढील निविदा अंतीम होईपर्यंतच्या कालावधीसाठी पूर्वीच्याच कंत्राटदाराकडून पूर्वीच्याच दराने काम करुन घेण्याचा निर्णय शासनाने घेतला व त्याप्रमाणे कार्यवाही करण्यात आली आहे. आता आयुक्त (कृषि) यांनी पार पाडलेल्या निविदा प्रक्रियेमध्ये आनंद पब्लिकेशन, जळगाव यांनी नमूद केलेले दर न्यूनतम असल्यामुळे अंकाच्या छपाईचे काम आनंद पब्लिकेशन, जळगाव यांचेकडे सुपुर्द करण्यास मंजूरी देण्याचा प्रस्ताव कृषि आयुक्तालयाच्या दि.२१.१०.२०१६ च्या पत्राने शासनास सादर करण्यात आला आहे. कृषि आयुक्तालयाच्या प्रस्तावाच्या अनुषंगाने शेतकरी मासिकाच्या निविदा प्रक्रियेस मान्यता देणे, सदर निविदा प्रक्रियेनुसार पात्र निविदाधारकांना अनुज्ञेय रकमांचे प्रदान करणे आणि अंकाच्या टपाल बटवडयासाठी येणाऱ्या खर्चास मान्यता देणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय -**

कृषि आयुक्तालयाच्या दि.२१.१०.२०१६ च्या पत्राने प्राप्त झालेल्या प्रस्तावांवर साकल्याने विचार करुन शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

१) शेतकरी मासिकाच्या छपाईसंदर्भात प्रस्तुत आदेश निर्गमित झाल्यापासून एक वर्षाकरिता म्हणजेच एप्रिल, २०१७ ते मार्च, २०१८ या कालावधीकरिता आयुक्त (कृषि) यांनी त्यांचे स्तरावर केलेल्या ई-निविदा प्रक्रियेतील न्यूनतम निविदाधारक आनंद पब्लिकेशन, जळगाव यांना शेतकरी मासिकाच्या छपाईचे काम देण्याच्या कार्यवाहीसह, लेखांचे संपादन / सुलभीकरण, लेखाची मांडणी / सजावट याबाबतच्या निविदांना त्याचप्रमाणे अंकाच्या टपाल बटवडयाकरिता येणाऱ्या टपालखर्चास खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | प्रतीची संख्या | सन २०१६-१७ चे वाटाघाटीनुसार कमी केलेले अंतीम दर (प्रति अंक दर रु.) | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | मॅफेलिथो पेपरसाठी | | न्यूजग्लेज पेपरसाठी | |
| | | ५६ पाने | १०४ पाने | ५६ पाने | १०४ पाने |
| १ | १००,००० प्रती पर्यंत | १६.५० (६.४५) | ३३.५० (६.३४) | १७.०० (६.२५) | ३३.९० (५.९३) |
| २ | १००,००१ ते १५०,००० | १६.४५ (६.४५) | ३३.४० (६.२०) | १६.९० (५.९५) | ३३.८० (५.७९) |
| ३ | १५०,००१ ते २००,००० | १६.३० (५.८४) | ३३.३० (६.०५) | १६.८० (५.६६) | ३३.७० (५.६४) |
| ४ | २००,००१ ते २५०,००० | १६.२० (५.५३) | ३३.२० (५.९०) | १६.७० (५.३६) | ३३.६० (५.४९) |
| ५ | २५०,००१ ते ३००,००० | १६.१० (५.२२) | ३३.१० (५.७५) | १६.६० (५.००) | ३३.५० (५.३४) |
| ६ | ३००,००१ व त्यापुढे | १६.०० (४.९१) | ३३.०० (५.६०) | १६.५० (४.७६) | ३३.४० (५.१९) |
| | **अधिक वॅट (टक्के)** | **५.५** | **५.५** | **५.५** | **५.५** |

२) शेतकरी मासिकाच्या अंक छपाईबाबत प्रस्तुत निर्णयानुसार निविदाधारकांशी आवश्यक तो करारनामा करण्यास आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. करारनामा केल्यानंतर त्याची एक प्रत शासनाला पाठविण्यात यावी.

३) यावरील खर्च "मागणी क्र.डी-३, २४०१-पीक संवर्धन, १०९-विस्तार व प्रशिक्षण, १०९-विस्तार व शेतकरी प्रशिक्षण, (०१) माहिती व प्रचार (०१) (०२) शेतकरी मासिक, (२४०१ ०७४४) या योजनेत्तर" लेखाशिर्षाखाली सन २०१७-१८ करिता मंजूर केलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२३१४४७३७१९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Sharad Balkrishna Pawaskar

Digitally signed by Sharad Balkrishna Pawaskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sharad Balkrishna Pawaskar
Date: 2017.03.23 14:49:00 +05'30'

**(श. बा. पावसकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
२) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) कृषि संचालक (वि. व प्र.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) कृषि उपसंचालक तथा संपादक, शेतकरी मासिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

५) महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा परिक्षा), मुंबई
६) महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
७) महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा परिक्षा), नागपूर
८) महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता),नागपूर
९) संचालक, लेखा व कोषागार, मुंबई.
१०) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
११) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१२) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२
१३) संचालक, शासन लेखन,मुद्रण सामग्री संचालनालय, चर्नी रोड, मुंबई ४
१४) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, पुणे
१५) वित्त विभाग (व्यय-१/विनियम/अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई -३२
१६) सह सचिव (कार्या.११-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१७) उप सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१८) आनंद पब्लिकेशन, पोस्ट बॉक्स नं.१४०,१०६, मुसळी फाटा, धुळे रोड, राष्ट्रीय महामार्ग क्र.६, ता.धरणगाव, जि.जळगाव
१९) कक्ष अधिकारी, २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२०) निवडनस्ती, कार्यासन-११अे.